२०

20110111184250001

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका

प्रशासन अधिकारी, लेखा अधिकारी व लेखापाल या पदांच्या निर्मितीबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक पीसीसी-३०९०/२८१/सीआर-४७/नवि-२२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक: २० फेब्रुवारी, १९९०.

पहा:- आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांची पुढील पत्रे—
१] प्रशासन/१/कावि/१०९/१९९०, दि. ६ फेब्रुवारी, १९९०.
२] प्रशासन/१/११३/१९९०, दिनांक ८ फेब्रुवारी, १९९०.

शासन निर्णय:- मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५१ [४] अन्वये प्रदान करण्यांत आलेल्या अधिकाराचा वापर करून शासन याद्वारे पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या प्रशासन अधिकारी, लेखा अधिकारी व लेखापाल ही पदे पुढे दर्शविलेल्या शैक्षणिक पात्रतेत व वेतनश्रेणीत निर्माण करण्याच्या पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या प्रस्तावास मंजुरी देत आहे.

| पदाचे नांव | वेतनश्रेणी | मंजूर करावयाची पदे. | शैक्षणिक अर्हता |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १] प्रशासन अधिकारी. | ६००-११५० | २ [एक पद जकात विभागासाठी व एक पद आरोग्य विभागासाठी]. | सरळसेवा भरतीने:- मान्यता प्राप्त विद्यापिठाचा कोणत्याही शाखेचा पदवीधर, स्थानिक स्वराज्य संस्था अथवा शासन अंगीकृत कार्यालयामधील कामकाजाचा ७ वर्षांचा अनुभव आवश्यक. एल. जी. एस. पदविका-धारकांना प्राधान्य.<br>पदोन्नतीने:- कार्यालय अधिक्षक नायब तहसिलदार संवर्गामधील पदवीधर कर्मचारी की ज्यांची महानगरपालिकेत ७ वर्षे सेवा झालेली आहे. |

क. मा. प.

| | | | |
|---|---|---|---|
| २] लेखाधिकारी | रु. ६००-१२५० | १ [आरोग्य विभागासाठी]. | <u>सरळसेवा भरतीने:-</u> मान्यता प्राप्त विद्यापिठाकडील वाणिज्य शाखेकडील अकौंटसी या प्रमुख विषयासह एम. कॉम. अथवा बी. कॉम. पदवी, स्थानिक स्वराज्य संस्था अथवा शासन अंगीकृत कार्यालयामधील अथवा नामांकित खाजगी क्षेत्रामधील कंपनीमधील संबंधीत कामकाजाचा ५ वर्षांचा अनुभव आवश्यक. एल. जी. एस. अथवा एल. एस. जी. डी. पदवी धारकांना प्राधान्य.<br><u>पदोन्नती:-</u> उपलेखापाल रु. ५००-९०० वेतनश्रेणी मधील वाणिज्य पदवीधर कर्मचारी की ज्यांची महानगरपालिका सेवेत ५ वर्षे सेवा पूर्ण झाली आहे. एल. जी. एस. अथवा एल. एस. जी. डी. पदवीधारकांना प्राधान्य. |
| ३] लेखापाल | रु. ५००-९०० | १ [आरोग्य विभागासाठी] | <u>सरळसेवा भरतीने:-</u> मान्यता प्राप्त विद्यापीठाकडील वाणिज्य शाखेची अकौंट व ऑडीट या विषयासह एम. कॉम. अथवा बी. कॉम. पदवी, स्थानिक स्वराज्य संस्था अथवा शासन अंगीकृत कार्यालयामधील अथवा खाजगी क्षेत्रातील नामांकित कंपनीमधील संबंधीत कामकाजाचा ५ वर्षे अनुभव आवश्यक. |

१९|१५

एल. जी. एस. अथवा एल. एस. जी. डी.
पदवीधारकांना प्राधान्य.

पदोन्नतीने:-

उपलेखापाल रु. ३९५-८०० वेतनश्रेणी मधील वाणिज्य पदवीधर कर्मचारी की ज्यांची महानगरपालिकेमध्ये ५ वर्षे सेवा झाली आहे. एल. जी. एस. अथवा एल. एस. जी. डी. पदवीधारकांना प्राधान्य.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ मा. प. पटवर्धन ]
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव.

प्रति,

आयुक्त,
~~पिंपरी-चिंचवड महानगरपालिका,~~
पिंपरी, पुणे-४११०१८ [५ प्रतींसह].